# महाराष्ट्र शासन

क्रमांकः- संकीर्ण-२०२२/ प्र.क्र.२१५/१३स,
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
मंत्रालय, विस्तार इमारत,
मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई- ४०० ०३२.
दिनांकः- २३ मे, २०२३

वाचा:- १. क्रमांक:- संकीर्ण ०८२१/ प्र.क्र.९४/१३स, दिनांक २७ ऑगस्ट,२०२१ रोजीचे आदेश.
२. क्रमांक:- जिमस ०७२२/ प्र.क्र.८३/२-स, दिनांक १६ फेब्रुवारी,२०२३ रोजीचे पत्र.

## आदेश

ज्याअर्थी, नाशिक जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेसंदर्भात मा.उच्च न्यायालयाच्या स्थगिती आदेशामुळे बँकेचे व्यवस्थापन अधिक काळ संचालक मंडळाकडे राहिल्याने बँकेची आर्थिक स्थिती खालावलेली असणे, सन २०१७ ते मार्च,२०२१ पर्यंत सदर बँक, रिझर्व्ह बँकेद्वारा विहित केलेली ९% भांडवल पर्याप्ता (CRAR) राखू शकलेली नसणे. त्यामुळे, बँकेकडून बँकिंग नियमन अधिनियम १९४९ चे कलम ११ मधील तरतूदीचे उल्लंघन होत असणे. त्याचप्रमाणे, बँक परवान्यासाठी आवश्यक अर्हता निकष बँक पूर्ण करू शकत नसल्याने बँकिंग परवाना धोक्यात आलेला असणे. बँकेच्या आर्थिक स्थितीमध्ये सुधारणा करून बँक पूर्व पदावर आणण्यासाठी बँकेवर नियुक्त केलेले प्रशासक मंडळ आणखी काही कालावधीसाठी राहणे आवश्यक असणे. या कालावधीत प्रशासक मंडळास थकीत कर्जाची वसुली, भांडवल पर्याप्ततेमध्ये सुधारणा, बँकिंग व्यवसायात वाढ व बँकेच्या कामकाजामध्ये व्यावसायिक व्यवस्थापन आणणे यासाठी काही कालावधी लागणार असल्याने दिनांक २७ ऑगस्ट, २०२१ रोजीच्या आदेशान्वये सदर बँकेची निवडणूक ज्या टप्प्यावर असेल त्या टप्प्यावर दिनांक ३१ मार्च, २०२२ पर्यंत वाचा क्र.१ येथील आदेशान्वये पुढे ढकलण्यात आली होती.

ज्याअर्थी, नाशिक जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेच्या आर्थिक स्थितीमध्ये सुधारणा करून बँक पूर्वपदावर आणण्यासाठी महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० चे कलम ११० अे (१)(iii) मधील तरतूदीस कलम १५७ नुसार सुट देऊन नाशिक जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेच्या प्रशासकाच्या कालावधीस दिनांक ३१.०३.२०२२ ते दिनांक ३०.०६.२०२३ पर्यंत दिनांक १६ फेब्रुवारी, २०२३ रोजीच्या पत्रान्वये मुदतवाढ देण्यात आली आहे.

त्याअर्थी, नाशिक जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेच्या आर्थिक स्थितीमध्ये सुधारणा करणे, अनुत्पादित कर्जाची वसुली करणे, बँकेची भांडवल पर्याप्तता वृद्धींगत करणे, थकबाकीचे प्रमाण कमी करण्यासाठी प्रभावशाली उपाययोजना करून बँक सुस्थितीत येणेसाठी सदर बँकेवर नियुक्त करण्यात आलेल्या प्रशासक / प्रशासक मंडळास पुरेसा कालावधी मिळाल्यास सदर बँक आर्थिक सुस्थितीत येण्यास मदत होईल. ही वस्तुस्थिती विचारात घेवून महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम,१९६० मधील कलम १५७ अन्वये शासनास प्राप्त असलेल्या अधिकारात कलम ७३कक मधील तरतूदीला सुट देऊन नाशिक जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेची निवडणूक प्रक्रिया ज्या

टप्प्यावर असेल त्या टप्प्यावर या आदेशाच्या दिनांकापासून दिनांक ३०.०६.२०२३ पर्यंत पुढे ढकलण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०५२३१८०७०५३३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL JAYRAM
CHAUDHRY

Digitally signed by ANIL JAYRAM CHAUDHRY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=f26cf80358fa3133e4d85ddac30ae54b06c63743fd5510dc0ebca082b6c483ce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D124AE9BBD15BED87DBD08EF779CF1B85A4020339EB1C2EF0E112FB67063011C, cn=ANIL JAYRAM CHAUDHRY
Date: 2023.05.23 18:07:31 +05'30'

**( अनिल ज. चौधरी )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. सचिव, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. विभागीय सहनिबंधक / जिल्हा उपनिबंधक/ उपनिबंधक, सहकारी संस्था नाशिक.
४. निवडनस्ती कार्यासन १३-स.